Project RUDRA -
**आहरण व संवितरण अधिकारी आणि नियंत्रक अधिकारी घोषित करणे व वित्तीय मान्यता देणे.**

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्र. - जेएलएम-०५२५/प्र.क्र.११०/तुरुंग-२**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक : २८ मे, २०२५.

**वाचा-**

१. गृह विभाग, शासन निर्णय क्र. H.D.२८०१४/१९/२०२५-Prison-१, दिनांक १३.०५.२०२५.
२. गृह विभाग व श्री. अथर्व देशपांडे यांच्यातील करारनामा, दिनांक ०७.०५.२०२५.

**प्रस्तावना-**

राज्यामध्ये पहिल्यांदाच गंभीर गुन्हेगारांच्या मानसशास्त्रीय अभ्यासावर आधारीत Criminology Research Project “RUDRA” (Research Unit for Detection and Resolution of Anomalies in Criminals) प्रकल्प राबविण्यात येत असून, या प्रकल्पांतर्गत संशोधनाचे निष्कर्ष राज्यातील गुन्हे तपास यंत्रणांसाठी, तसेच गंभीर गुन्हेगाराच्या पुनर्वसन प्रक्रियेस उपयुक्त ठरणार आहेत.

२. सदर संशोधन कार्यासाठी नागपूर व अमरावती येथील कारागृहातील बंदयाच्या मुलाखती घेऊन पायलट अभ्यास पूर्ण केला असून, या प्रकल्पांचा कालावधी १० वर्षे (२०२५-२०३५) आहे. सदर प्रकल्प अंमलबजावणीसाठी महाराष्ट्र शासन, गृह विभाग व संशोधन टीम यांच्यामध्ये ०७.०५.२०२५ रोजी करारनामा करण्यात आला असून, प्रकल्प राबविण्यासाठी दिनांक १३.०५.२०२५ अन्वये शासन मंजूरी देण्यात आली आहे.

३. सदर करारनाम्यातील वित्तीय तरतूदीनुसार १० वर्षेसाठी प्रकल्पाचा एकूण खर्च रु.१.८० कोटी असून, दरवर्षी रु.१८ लक्ष खर्च अपेक्षित आहे. सदर खर्चास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

Criminology Research Project “RUDRA” (Research Unit for Detection and Resolution of Anomalies in Criminals) हा राज्याच्या सर्व कारागृहांमध्ये १० वर्षांकरिता राबविण्यासाठी सदर प्रकल्पाच्या रु.१.८० कोटी इतक्या एकूण खर्चास खालील नमूद अटी व शर्ती च्या अधीन राहून यादारे मंजूरी देण्यात येत आहे.

१. सदर निधीचा विनियोग प्रामुख्याने संशोधन साहित्य, पुस्तके, उपकरणे, प्रवास, वसतिगृह, तांत्रिक सहाय्य, मानधन व इतर प्रशासनिक खर्चासाठीच करण्यात यावा.
२. सदर प्रकल्पाचा प्रगती अहवाल करारनामा (MoU) ला अनुसरुन गृह विभागास अग्रेषित करावा. तसेच दरवर्षी खर्चाचे उपयोगिता प्रमाणपत्र (Utilization Certificate) सादर करणे बंधनकारक आहे.
३. शासनाकडून उपरोक्त प्रकरणी अनुदान दर तिमाहीच्या आधारावर वितरित करण्यात येईल. (प्रत्येक ३ महिन्यांनी रु. ४,५०,०००/- रक्कम अदा करण्यात येईल)

२. सदर प्रकल्पाची देयके अदा करण्यासाठी सहसचिव/ उपसचिव (तुरुंग), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई यांना नियंत्रक अधिकारी म्हणून तसेच त्यांच्या अधिनस्त कक्ष अधिकारी/अवर सचिव, रोख शाखा, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून याद्वारे घोषित करण्यात येत आहे.

३.  Project “RUDRA” चे प्रत्यक्ष कामकाज सूरू झाले असून, सदर प्रकल्पाच्या नावाने, चालू खाते (Current Account) उघडण्यात आले असून, त्यांचा कार्यालयीन पत्ता, *Flat No. २०३, Vikram Apartment, Bhagat Galli, Matunga Road, Matunga West, Mumbai- ४०००१६* असा आहे. तसेच त्यांना वितरीत करावयाचा निधी, त्यांच्या बँकेच्या Project RUDRA या खात्यावर थेट वितरीत करण्यात येईल.

४. उपरोक्त प्रकरणी यावरील होणारा खर्च मागणी क्र. बी-५, मुख्यलेखाशिर्ष २०५६ (तुरुंग) (००) (००) (००१), संचालन व प्रशासन (००) (०१) कारागृह निरीक्षणालय, (२०५६ ००२६), १३- कार्यालयीन खर्च या लेखाशिर्षाखालील उपलब्ध अनुदानातून भागविण्यात यावा.

५.  वित्त विभाग शासन निर्णय क्र. विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३ विनियम भाग-२, दिनांक १७.०४.२०१५ व वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८ भाग-पहिला, उपविभाग- तीन मधील अ.क्र.४ परिच्छेद क्र.२७ (२) मध्ये नमूद करण्यात आलेल्या अटीस अधीन राहून प्रशासनिक विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारांस अनुसरुन सक्षम प्राधिकारी यांच्या मान्यतेने सदर शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

६.  सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.२२६/२०२४/व्यय-८, दिनांक ११.०३.२०२४ अन्वये दिलेल्या मान्यतेस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

७.  सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संगणक संकेतांक २०२५०५२८१८२१२५१९२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन पारीत करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या ओदशानुसार व नावांने,

NARAYAN BIRA MANE

Digitally signed by NARAYAN BIRA MANE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOME DEPARTMENT, 2.5.4.20=1dfb457576797050f19aafaa495673fc843c789942459cd39fc5561071b4a70c, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=79C09BA352C5B3E65B259113F1CDCFAB29FB961D4EA9A24411D7F622D2ED20BF, cn=NARAYAN BIRA MANE
Date: 2025.05.28 18:22:20 +05'30'

**(नारायण बि.माने)**
**अवर सचिव, गृह विभाग**

**प्रत,**

१. प्रधान महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा) महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर,
२. अपर मुख्य सचिव (वित्त) वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई,
३. प्रधान सचिव (अ. व सु.) गृह विभाग, मंत्रालय, मुंबई,
४. अपर पोलीस महासंचालक व महानिरीक्षक, कारागृह व सुधारसेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे,
५. कारागृह उपमहानिरीक्षक, पूर्व विभाग, नागपूर/पश्चिम विभाग, पुणे/मध्य विभाग, छत्रपती संभाजीनगर/दक्षिण विभाग, मुंबई/ नाशिक विभाग, नाशिक.
६. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
७. निवासी लेखा परीक्षा, मुंबई,
८. संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई,
९. सर्व संबंधित जिल्हा कोषागार अधिकारी,
१०. सर्व कारागृह अधीक्षक, महाराष्ट्र राज्य
११. कक्ष अधिकारी, बीयुडी-१, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई,
१२. श्री. अथर्व देशपांडे, रिसर्च हेड प्रोजेक्ट रुद्र, फलॅट नं. २०३, विक्रम अपार्टमेंट, भगत गल्ली, माटुंगा रोड, माटुंगा पश्चिम, मुंबई -४०००१६.
१३. निवड नस्ती, तुरुंग-२, गृह विभाग,मंत्रालय, मुंबई.